सन २०२४-२५ मध्ये मुख्यमंत्री शाश्वत कृषि सिंचन योजनेच्या अंमलबजावणीस प्रशासकीय मान्यता देणेबाबत...

# महाराष्ट्र शासन

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः मुशाशे ०५२४/प्र.क्र. ११३/१४-अे**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक

मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२

दिनांक : १६ मे, २०२४.

**संदर्भ :**

१. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र. कोशाशे-४२१८/प्र.क्र.८६/८अे दि. १९ ऑगस्ट,२०१९.

२. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र. प्रकृसिं-०६१९/प्र.क्र.१६४/१४-अे दि. १८ नोव्हेंबर,२०२१.

३. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र. शाशेअ-२०२२/प्र.क्र.७५/१४-अे दि. २९ जून,२०२२.

**प्रस्तावना :**

राज्यातील शेतकऱ्यांना शाश्वत सिंचनाची सोय उपलब्ध करुन देण्याच्या उद्देशाने अवर्षणप्रवण क्षेत्र तसेच आत्महत्याग्रस्त व नक्षलग्रस्त जिल्ह्यात मुख्यमंत्री शाश्वत कृषि सिंचन योजना राबविण्यास दि.१९ ऑगस्ट,२०१९ रोजीच्या शासन निर्णयानुसार मान्यता देण्यात आली असून सदर योजना राज्यातील उर्वरित तालुक्यांमध्ये देखील राबविण्याचा निर्णय शासनाने दि. १८ नोव्हेंबर,२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये घेतला आहे. मुख्यमंत्री शाश्वत कृषि सिंचन योजनेंतर्गत सूक्ष्म सिंचनास पूरक अनुदानाबरोबरच, वैयक्तिक शेततळे, शेततळयाचे अस्तरीकरण, हरित गृह उभारणे व शेडनेट हाऊस उभारणे या घटकांकरिता अनुदान वितरीत करण्यात येते.

या योजनेंतर्गत प्रधानमंत्री कृषि सिंचन योजनेंतर्गत राज्यातील अल्प व अत्यल्प भू- धारक शेतकऱ्यांना ५५% आणि इतर शेतकऱ्यांना (५ हेक्टरच्या मर्यादेत) ४५% अनुदान देण्यात येते. सदर अनुज्ञेय अनुदानाशिवाय “मुख्यमंत्री शाश्वत कृषि सिंचन” योजनेंतर्गत अल्प व अत्यल्प भू-धारक शेतकऱ्यांना २५ % आणि इतर शेतकऱ्यांना ३०% पूरक अनुदान देऊन सूक्ष्म सिंचनासाठी अनुक्रमे ८०% व ७५% एकूण अनुदान देण्यात येते. त्याचप्रमाणे दि. २९ जून, २०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये, मुख्यमंत्री शाश्वत कृषि सिंचन योजनेत वैयक्तिक शेततळे या बाबीचा समावेश करण्यात आलेला आहे.

वित्त विभागाने मुख्यमंत्री शाश्वत कृषि सिंचन योजनेस सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता रु. ४००.०० कोटीची अर्थसंकल्पीय तरतूद उपलब्ध करुन दिलेली आहे. त्यानुसार सदर योजनेकरिता सन २०२४-२५ मध्ये उपलब्ध रू. ४००.०० कोटी निधीच्या मर्यादेत प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्यानुसार शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :**

१. सन २०२४-२५ मध्ये मुख्यमंत्री शाश्वत कृषि सिंचन योजना राबविण्यासाठी रु. ४०० कोटी (रुपये चारशे कोटी फक्त) निधीच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता देण्यात येत असून सदर मंजूर कार्यक्रमाचा घटकनिहाय तपशील पुढीलप्रमाणे :

(रुपये कोटीत)

| अ.क्र. | बाब | मंजूर कार्यक्रम |
|---|---|---|
| १. | सुक्ष्म सिंचन<br>[केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री कृषि सिंचन योजनेंतर्गत -प्रति थेंब अधिक पीक (सुक्ष्म सिंचन) घटकांतर्गत देण्यात येणाऱ्या अनुदानास पूरक अनुदान]<br>अ. ठिबक सिंचन<br>आ. तुषार सिंचन | ३०० |
| २. | वैयक्तिक शेततळे | १०० |
| | **एकूण** | **४००** |

२. या योजनेच्या अंमलबजावणीची कार्यवाही महा-डीबीटी प्रणालीद्वारे करावी आणि लाभार्थ्यांच्या आधार संलग्न बँक खात्यावर अनुदानाची रक्कम सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणालीव्दारे जमा करावी.

३. या योजनेंतर्गत वितरीत निधी कोषागारातून आहरित करण्याकरिता आयुक्त (कृषि) यांना नियंत्रक अधिकारी व सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. मुख्यमंत्री शाश्वत कृषि सिंचन योजनेची अंमलबजावणी करताना प्रधान मंत्री कृषि सिंचन योजनेच्या मार्गदर्शक सूचनांचे व संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयातील अटी व शर्तींचे पालन करावे.

५. या योजनेंतर्गत वितरीत निधीच्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र महालेखाकार कार्यालयास पाठवून त्याची प्रत राज्य शासनास सादर करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०५१६१४३५२२४४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MAHENDRA SOPAN GHADGE

Digitally signed by MAHENDRA SOPAN GHADGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=9847eac29efa7aa62661b16d1619a1bfaf6d99b23ec6836d8d498d0797965898, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=761BD1B7183B95814545ACE2DBF80778C68C7EE4EF46BAA6EA9B8BD1F47C2642, cn=MAHENDRA SOPAN GHADGE
Date: 2024.05.16 14:48:01 +05'30'

**( महेंद्र सो. घाडगे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति:**

१. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई,
२. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई,
३. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई,
४. प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई,

५. मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
६. मा. उप मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
७. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य पुणे,
८. संचालक (सर्व), कृषि आयुक्तालय, पुणे,
९. विभागीय कृषि सह संचालक (सर्व),
१०.महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय,मुंबई,
११.महालेखापाल महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर,
१२.महालेखापाल महाराष्ट्र (लेखा परिक्षा) मुंबई /नागपूर,
१३. वित्त विभाग (व्यय १/अर्थसंकल्प १३), मंत्रालय, मुंबई,
१४.नियोजन विभाग (का-१४३१), मंत्रालय, मुंबई,
१५.निवडनस्ती (कार्यासन १४-अे).